**कृषि प्रक्रिया सहकारी संस्था-**
**सन २०२४-२५ च्या मंजूर तरतूदीतून राष्ट्रीय सहकारी विकास निगम, नवी दिल्ली यांचेकडील कर्ज व व्याजाची परतफेड करण्यासाठी निधी वितरीत करणेबाबत...**

**महाराष्ट्र शासन**
**सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग,**
**शासन निर्णय क्र.संकीर्ण-०९२४/प्र.क्र.४९/१-स**

नवीन प्रशासकीय इमारत, १४ वा मजला, मादाम कामा रोड,
हुतात्मा राजगुरु चौक, मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक:- २८ मार्च , २०२५.

<u>वाचा:-</u>

१) शासन निर्णय, सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग क्र.प्रक्रिया-११२००४/प्र.क्र.१६२(अ)/९-स, दि.१२.१०.२००७.
२) शासन परिपत्रक, वित्त विभाग, क्र. अर्थसं-२०२४/प्र.क्र.३४/अर्थ-३, दि.०१.०४.२०२४.
३) शासन परिपत्रक, वित्त विभाग, क्र. अर्थसं-२०२४/प्र.क्र.८०/अर्थ-३, दि.२५.०७.२०२४.
४) सहायक निदेशक (वित्त) राष्ट्रीय सहकारी विकास निगम, नवी दिल्ली यांचे पत्र क्र.NCDC: A&C/ IX(1)/Rep/09, दि.०४.०७.२०२४.
५) राष्ट्रीय सहकारी विकास निगम, नवी दिल्ली यांचा दि.२३.०८.२०२४, दि.०२.०९.२०२४, दि.०४.०९.२०२४ व दि.३१.०१.२०२५ रोजीचे ईमेल संदेश.
६) शासन परिपत्रक, वित्त विभाग, क्र. अर्थसं-२०२४/प्र.क्र.८०/अर्थ-३, दि.१७.०३.२०२५.

<u>प्रस्तावना:-</u>

राज्य शासनाकडून (सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग (पणन प्रभाग)) राष्ट्रीय सहकारी विकास निगम पुरस्कृत योजनेंतर्गत कृषि प्रक्रिया सहकारी संस्थांना प्रकल्पांच्या उभारणीकरीता विहीत केलेल्या आकृतीबंधानुसार शासकीय भागभांडवल तसेच कर्ज उपलब्ध करुन देण्यात येते. राष्ट्रीय सहकारी विकास निगमामार्फत या योजनेअंतर्गत राज्य शासनास उपलब्ध करुन देण्यात येणारा निधी राज्य शासनावर संपूर्णपणे कर्ज म्हणून गणला जातो. सन २०२३-२४ पर्यंत राज्य शासनास राष्ट्रीय सहकारी विकास निगमाने मंजूर केलेल्या कर्जापैकी, परतफेडीकरीता पात्र कर्जातील मुद्दलाची व मंजूर कर्जावरील व्याजाच्या देय हप्त्यांची परतफेड करण्याकरीता रा.स.वि.नि.ने संदर्भ क्र.४ येथील पत्र व संदर्भ क्र.५ येथील ई-मेल संदेशान्वये राज्य शासनास सूचित केले आहे. रा.स.वि.नि. यांनी सदर ई-मेलनुसार सन २०२३-२४ पर्यंत राज्य शासनास मंजूर करण्यात आलेल्या कर्जापैकी सन २०२३-२४ मधील प्रलंबित मुद्दल रु.२१,२९,७०२/- व व्याज रु.१,२५,२४२/- असे एकूण रु.२२,५४,९४४/- व सन २०२४-२५ मधील मुद्दल रु.२,०१,३९,४००/- व व्याज रु.३३,४४,४६४/- असे एकूण रु.२,३४,८३,८६४/- इतकी रक्कम दि.२०.०९.२०२४ पूर्वी अदा करण्याची विनंती केली होती.

सन २०२४-२५ या आर्थिक वर्षात रा.स.वि.नि. कडील कर्जाच्या मुद्दलाची परतफेड करण्याच्या ६००३ ०४५८ या लेखाशिर्षाखाली रु.२,४३,५०,०००/- व कर्जाच्या मुद्दलावरील व्याजाच्या परतफेडीच्या २०४९ २७११ या लेखाशिर्षाखाली रू.४०,४७,०००/- असा एकूण रू.२,८३,९७,०००/- इतकी तरतूद अर्थसंकल्पित आहे. सदर तरतूदीमधून सन २०२४-२५ या आर्थिक वर्षामध्ये सन २०२३-२४ मधील प्रलंबित मुद्दल रु.२१,२९,७०२/- व व्याज रु.१,२५,२४२/- असे एकूण रु.२२,५४,९४४/- व सन २०२४-२५ मधील मुद्दल रु.२,०१,३९,४००/- व व्याज रु.३३,४४,४६४/- असे एकूण रु.२,३४,८३,८६४/- इतकी रक्कम रा.स.वि.नि.ला अदा करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन आहे.

## शासन निर्णय:-

राज्यातील सहकार विकासाकरीता राष्ट्रीय सहकारी विकास निगम, नवी दिल्ली यांनी पणन विभागांतर्गत राबविण्यात येणाऱ्या कृषि प्रक्रिया सहकारी संस्थांच्या अर्थसहाय्याकरीता राज्य शासनास कर्ज मंजूर केलेले आहे. त्यानुषंगाने सन २०२३-२४ व सन २०२४-२५ मधील मुद्दल व व्याजाच्या परतफेडीच्या हप्त्यापोटी एकूण रु.२,५७,३८,८०८/- (अक्षरी रुपये दोन कोटी सत्तावन्न लाख अडतीस हजार आठशे आठ फक्त) इतकी रक्कम राष्ट्रीय सहकारी विकास निगम, नवी दिल्ली यांना अदा करण्यास या शासन निर्णयान्वये मंजूरी देण्यात येत आहे. सदर देयक हे “**बिनशर्त**” स्वरूपाचे आहे. वितरीत करावयाच्या तरतूदीचा सविस्तर तपशील खालीलप्रमाणे आहे:-

| अ.क्र. | आर्थिक वर्ष | मुद्दल | व्याज | एकूण |
|---|---|---|---|---|
| १ | २०२३-२४ | २१,२९,७०२/- | १,२५,२४२/- | २२,५४,९४४/- |
| २ | २०२४-२५ | २,०१,३९,४००/- | ३३,४४,४६४/- | २,३४,८३,८६४/- |
| | **एकूण** | **२,२२,६९,१०२/-** | **३४,६९,७०६/-** | **२,५७,३८,८०८/-** |

२. सदर खर्च चालू आर्थिक वर्षात (सन २०२४-२५) खालील २ लेखाशिर्षांतर्गत सुधारीत अंदाजात मंजूर झालेल्या तरतूदीतून भागविण्यात यावा,

२.१) कर्ज- रु.२,२२,६९,१०२/- (रूपये दोन कोटी बावीस लक्ष एकोणसत्तर हजार एकशे दोन फक्त)

**मागणी क्रमांक व्ही-४ -**

मुख्य लेखाशिर्ष
६००३, राज्य शासनाचे देशांतर्गत ऋण
(१०८), राष्ट्रीय सहकार विकास महामंडळाकडून मिळालेली कर्जे
(००) (०२) राष्ट्रीय सहकारी विकास महामंडळाकडून मिळालेली कर्जे (पणन) (अनिवार्य) भारित (६००३ ०४५८)
५६, कर्जाची परतफेड

**२.२)** व्याज- रु.३४,६९,७०६/- (रुपये चौतीस लाख एकोणसत्तर हजार सातशे सहा फक्त)

**मागणी क्रमांक व्ही-१**

मुख्य लेखाशिर्ष
२०४९, व्याज प्रदाने
०१, देशांतर्गत ऋणावरील व्याज
२००, देशांतर्गत इतर ऋणावरील व्याज
(०२) कर्जावरील व्याज
(०२) (०७) राष्ट्रीय सहकारी विकास महामंडळाकडून मिळणाऱ्या कर्जावरील व्याज (पणन) (अनिवार्य) भारित (२०४९ २७११)
४५, व्याज

३. राष्ट्रीय सहकारी विकास निगम, नवी दिल्ली यांना मंजूर केलेली उपरोल्लिखित रक्कम अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई यांचेकडून आहरण करून राष्ट्रीय सहकारी विकास निगमाला त्यांचे वितरण करण्यासाठी श्री.सु.पु.पांगारकर, कार्यासन अधिकारी, रोखशाखा, सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग मंत्रालय, मुंबई यांना आहरण व संवितरण अधिकारी तसेच, श्री.सं.ज्ञा.देशमुख, उप सचिव (पणन), (V००१०) सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई यांना नियंत्रण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे.

४. उपरोल्लेखित रक्कम RTGS सुविधेद्वारे राष्ट्रीय सहकारी विकास निगम, नवी दिल्ली यांना अदा करावयाची असून त्याबाबतचा तपशिल खालीलप्रमाणे आहे:-

| | |
|---|---|
| Name of the account | National Cooperative Development Corporation |
| Name of the Bank | State Bank of India |
| Name of the Branch | Commercial Branch, Nehru Place, Delhi |
| Account No. | 32164052874 |
| IFSC Code | SBIN0004298 |

५. राष्ट्रीय सहकारी विकास निगम, नवी दिल्ली यांनी सदर रक्कम प्राप्त झाल्याची पोच महाराष्ट्र शासनास नोंदणीकृत डाकेने/ई-मेलद्वारे मुद्रांकित पावती पाठवावी.

६. वित्त विभागाच्या संदर्भाधीन दि.२५.०७.२०२४ व दि.१७.०३.२०२५ च्या शासन परिपत्रकातील अटींची तसेच, त्यासोबतच्या परिशिष्टातील प्रस्तावाला लागू असलेल्या अटींची पूर्तता होत असल्याचे (परिशिष्टातील अनुक्रमांक ८ येथील अट वगळून) प्रमाणित करण्यात येत आहे.

७.	सदरचा शासन निर्णय वित्त विभागाचा अनौपचारिक संदर्भ क्र.१३५/२०२५/व्यय-२, दि.२०.०२.२०२५ व अनौ.संदर्भ क्र.१९/२०२५/ ऋण व हमी कक्ष, दि.०७.०३.२०२५ अन्वये दिलेल्या सहमतीनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

८.	सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक २०२५०३२८१५४८५५६६०२ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकीत करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

SANTOSH DNYANDEO DESHMUKH

Digitally signed by SANTOSH DNYANDEO DESHMUKH
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=CO-OPERATION MARKETING AND TEXTILE DEPARTMENT, 2.5.4.20=9652b1a97746d93924d97e059e2acb2aa9b6ef9c2644ab23e6c801f3e656b5ad, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=17757CD30ED5F82FA2A50F777CBE634900B7D3EBCB60660E708648C95D8488B7, cn=SANTOSH DNYANDEO DESHMUKH
Date: 2025.03.28 15:49:43 +05'30'

**(श्री.संतोष देशमुख)**

**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१) उप सचिव (अर्थसंकल्प/पणन) यांचे स्वीय सहायक, सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई.
२) अवर सचिव/कक्ष अधिकारी, (९ स, १६ स, १७ स) सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई.
३) कार्यासन अधिकारी (रोखशाखा) तथा आहरण व संवितरण अधिकारी, सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई.( ३ प्रतीसह)
४) कक्ष अधिकारी (व्यय-२/अर्थोपाय/अर्थसंकल्प-१३) वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
५) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र राज्य-१/२, मुंबई/नागपूर.
६) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
७) निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई.
८) सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था, पुणे.
९) पणन संचालक, पणन संचालनालय, महाराष्ट्र राज्य, पुणे.
१०) सह संचालक, लेखा व कोषागरे (संगणक शाखा) नवीन प्रशासक भवन, ५ वा मजला, मंत्रालय, मुंबई.
११) संचालक/ उप निदेशक (वित्त) राष्ट्रीय सहकार विकास निगम, ४ सिरी इन्स्टिट्यूशनल एरिया, हौजखास, नवी दिल्ली,११०००१.
१२) क्षेत्रीय संचालक, राष्ट्रीय सहकार विकास निगम, ५. बी. जे. रोड, पुणे.
१३) निवडनिस्ती (१-स).